**दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासून करपात्र वस्तू / सेवा अथवा दोन्हीसाठी पुरवठादाराला करावयाच्या प्रदानातून २% TDS वजावट करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.३५/अर्थ-५**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २२ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा:</u> १. केंद्र शासन, वित्त मंत्रालय, सेंट्रल बोर्ड ऑफ इनडायरेक्ट टॅक्सेस आणि कस्टम्स यांचे अधिनियम क्रमांक ५०/२०१८- सेंट्रल टॅक्स, दिनांक १३ सप्टेंबर २०१८.
२. महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याअंतर्गत अधिसुचना क्र.५०/२०१८, राज्यकर दि.१८.०९.२०१८.
३. वित्त विभाग, महाराष्ट्र शासन यांचे परिपत्रक क्रमांक- संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५, दिनांक २८ सप्टेंबर, २०१८

<u>परिपत्रक :-</u>

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ व केंद्रिय वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ च्या कलम-५१ मध्ये वस्तु किंवा सेवा अथवा दोन्ही यांच्यावर मुळ स्त्रोतातून वजात करण्याची (TDS) तरतूद करण्यात आली आहे. या तरतुदीची अद्यापपर्यंत अंमलबजावणी करण्याचे निर्देश निर्गमित करण्यात आले नव्हते. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. १३ सप्टेंबर २०१८ व महाराष्ट्र शासनाच्या दि.१८.०९.२०१८ च्या अधिसुचनेनुसार उपरोक्त कलम-५१ मधील तरतुदींची अंमलबजावणी दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासून करावयाचे निर्देश देण्यात आलेले आहेत.

२. महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ व केंद्रिय वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ च्या कलम-५१ नुसार केंद्र शासनाच्या / राज्य शासनाच्या / स्थानिक स्वराज्य संस्थांच्या किंवा शासकिय अभिकरणांच्या आस्थापनांना वजातदार (Deductor) आणि वस्तू आणि सेवा अथवा दोन्ही पुरविणाऱ्या संस्थांना **वजाती (Deductee)** घोषित करण्यात आलेले आहे. कार्यालयाच्या स्तरावर आहरण व संवितरण अधिकारी यांनी **वजातदार (Deductor)** या नात्याने वस्तू किंवा सेवा अथवा दोन्ही अंतर्भूत असलेल्या देयकांमधून २% कर (TDS) वजावट करावयाची आहे. त्यास अनुसरुन या विभागाच्या नियंत्रणाखालील आहरण व संवितरण अधिकारी, यांना या परिपत्रकान्वये खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

**<u>३. आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावयाची कार्यवाही :-</u>**

१) करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हीबाबत २ % TDS देयकांमधून वजावट करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांनी www.gst.gov.in या प्रणालीवर स्वत:च्या कार्यालयाची नोंदणी करणे कायदयाने बंधनकारक आहे.

२) आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांच्याकडे दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ नंतर प्राप्त होणाऱ्या वस्तु किंवा सेवा इत्यादी संबंधिच्या पुरवठ्यासंदर्भात करावयाच्या प्रदानाच्या देयकांना महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियमांतर्गत TDS लागू होतो की नाही याची खातरजमा करावी.

३) दि. ०१.१०.२०१८ पूर्वी करण्यात आलेल्या संविदाच्या बाबतीत देखील TDS च्या तरतूदी लागू होतील.

४) कार्यकारी अभियंता/आहरण व संवितरण अधिकारी यांनी पुरवठादार / कंत्राटदार यांना देय असलेल्या रकमेबाबतची देयके तयार करताना देय असलेल्या एकूण रकमेमधुन २% TDS वजावट करण्याची दक्षता घ्यावी.

५) दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासुन वस्तू किंवा सेवा अथवा दोन्ही यांच्या पुरवठ्यासाठी करावयाच्या प्रदानावेळी जर सदरहू पुरवठ्याची संविदा करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हीच्या संदर्भात असेल व त्या संविदेचे मुल्य रु.२,५०,०००/- रकमेच्या वर असल्यास, अशी वजावट करणे बंधनकारक आहे. (MGST Act, २०१७)

६) कार्यकारी अभियंता/आहरण व संवितरण अधिकारी हे यासंदर्भात वैधानिक वजातदार (Statutary Deductor) असतील.

७) २% TDS वजावट करावयाच्या कार्यवाहीसाठी तपशीलवार माहितीसाठी राज्य कर आयुक्त, वस्तू व सेवा कर यांचे परिपत्रक क्रमांक २७T, दिनांक ०७/०७/२०१७ .**(परिशिष्ट-अ-१)** व अंतर्गत परिपत्रक क्र. २६ अे- दि. १९/०९/२०१८ **(परिशिष्ट-अ-२)** चे अवलोकन करावे.

८) वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींसाठी २ % TDS वजावट करण्यासाठी किंवा आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या शंका समाधान करण्यासाठी प्रत्येक जिल्हानिहाय वस्तू व सेवा कर विभागाने TDS Officers घोषित केले असून संबंधीत अधिकाऱ्यांची यादी यासोबत देण्यात येत आहे.**(परिशिष्ट-ब). (परिशिष्ट ब मधील** अधिकारी जर बदलीनंतर स्थानांतरीत झाले तर त्याच्याऐवजी नवीन अधिकाऱ्याची माहिती www.gst.gov.in या संकेतस्थळावर पहाता येईल.)

९) कार्यकारी अभियंता/आहरण व संवितरण अधिकारी यांच्या अधिनस्त कार्यालयातील कमीत कमी एक अधिकारी/कर्मचारी यांनी संबंधित जिल्ह्यातील Nodal Officer यांचेकडून प्रशिक्षण घ्यावे.

१०) आहरण व संवितरण अधिकारी यांनी अशा प्राप्त झालेल्या वजावटीच्या रकमा पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत भारतीय रिझर्व्ह बँक यांचेकडे जमा करणे कायदयाने बंधनकारक राहील.

११) भारतीय रिझर्व्ह बँकेकडे अशा वजावटीच्या रकमा जमा करण्यासाठी प्राधिकृत करण्यात आलेल्या बँकांची यादी सोबत देण्यात येत आहे.**(परिशिष्ट-क)**

१२) कार्यकारी अभियंता / आहरण व संवितरण अधिकारी यांनी वैधानिक **वजातदार (Deductor)** या नात्याने, भारतीय रिझर्व्ह बँकेत ज्या महिन्यामध्ये अशी रक्कम वजावट करुन जमा करतील, त्या पुढील महिन्याच्या १० दिवसांचे आत त्यांनी Form GSTR-७ मध्ये Return File करणे बंधनकारक राहील. या संबंधीची तपशीलवार माहिती **परिशिष्ट-अ-१** मधील अनुक्रमांक ३ मध्ये नमूद करण्यात आलेली आहे.

१३) आहरण व संवितरण अधिकारी यांनी देयकासोबत प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे. **(परिशिष्ट-ड)**

**१४) <u>शास्ती विषयक तरतुदी :-</u>**

(अ) महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायद्याच्या कलम ५१ (१) अ नुसार वजातदाराने टी डी एस कपात करण्यास कसूर केली असेल किंवा कमी रक्कम कपात केली असल्यास किंवा शासकीय खात्यात जमा करण्यास कसून केली असेल, तर वजातदार रु. १०,०००/- किंवा कपात न केलेल्या रकमेएवढ्या किंवा कमी कपात केलेल्या रकमेएवढ्या किंवा कपात केलेल्या परंतू शासकीय खात्यात जमा न केलेली रक्कम यापैकी जी जास्त असेल तेवढ्या शास्तीस पात्र असेल.

(ब) वजातदाराने टी डी एस प्रमाणपत्र विहित कालावधींमध्ये जारी करण्यास कसूर केली असेल तर वजातदार अशा पाच दिवसांचा कालावधी समाप्तीनंतरच्या दिवसांपासून टी डी एस प्रमाणपत्र जारी करेपर्यंत, विलंब फी म्हणून, प्रतीदिन रु. १००/- देण्यास पात्र असेल. ही विलंब फी रु. ५०००/- पेक्षा जास्त नसेल.

१५) वरीलप्रमाणे सर्व कार्यकारी अभियंता / आहरण व संवितरण अधिकारी व लेखा अधिकारी, मुंबई यांनी दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासून कार्यवाही सुरु करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८११२२१७१४०९२०१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Fulchand Sakharam Meshram

Digitally signed by Fulchand Sakharam Meshram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0999a56a304f3454a9dd3df265471fbb631df59c5372395182e697f8d5e12b6a, serialNumber=feb2ae40c6c3dd9d30216169190be794659c2694a9cc7c5d1f7fb8cd6963403c, cn=Fulchand Sakharam Meshram
Date: 2018.11.22 17:18:11 +05'30'

**( फु.स. मेश्राम )**
सह सचिव तथा आंतर वित्तीय सल्लागार,
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा/विधान परिषद व संसद सदस्य.
३. राज्यपालांचे सचिव.

४. मुख्यमंत्र्यांचे सचिव.

५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.

७. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

८. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

९. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

११. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२.

१२. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन* नागपूर ४४४००१.

१३. मा. प्रधान सचिव, सा.बां.वि. यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई.

१४. मा. सचिव (इमारती) यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई

१५. मा. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई.

१६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व मुख्य अभियंता (विद्युतसह)

१७. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व अधीक्षक अभियंता (विद्युतसह)

१८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई ४००००१.

१९. संचालक, उपवने व उद्याने संचालनालय, मुंबई ४००००१.

२०. किनारी अभियंता, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२१. अवर सचिव, वित्त विभाग/ग्राम विकास विभाग/आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

२२. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यकारी अभियंता (विद्युतसह)

२३. अवर सचिव (अर्थ)/विशेष अधिकारी (लेखापरीक्षा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

२४. कार्यासन अधिकारी (अर्थ-१,अर्थ-२,अर्थ-३, रोख शाखा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

२५. कार्यासन अधिकारी (कार्यासन अर्थ-५) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय (निवडनस्ती).

**दि. ०१ ऑक्टोबर २०१८ पासून करपात्र वस्तू /सेवा अथवा दोन्हीसाठी पुरवठादाराला करावयाच्या प्रदानातून २ % TDS वजावट करणेबाबत.......**

# महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ सप्टेंबर, २०१८

वाचा : १.केंद्र शासन, वित्त मंत्रालय, सेंट्रल बोर्ड ऑफ इनडायरेक्ट टॅक्सेस आणि कस्टमस यांचे अधिनियम क्रमांक ५०/२०१८- सेंट्रल टॅक्स, दिनांक १३ सप्टेंबर २०१८.
२.महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याअंतर्गत अधिसुचना क्र.५०/२०१८, राज्यकर दि.१८ सप्टेंबर, २०१८.

## शासन परिपत्रक :-

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ व केंद्रिय वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ च्या कलम-५१ मध्ये वस्तु किंवा सेवा अथवा दोन्ही यांच्यावर मुळ स्त्रोतातून वजात करण्याची (TDS) तरतूद करण्यात आली आहे. या तरतुदीची अद्यापपर्यंत अंमलबजावणी करण्याचे निर्देश निर्गमित करण्यात आले नव्हते. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. १३ सप्टेंबर, २०१८ व महाराष्ट्र शासनाच्या दि.१८ सप्टेंबर, २०१८ च्या अधिसुचनेनुसार उपरोक्त कलम-५१ मधील तरतुदींची अंमलबजावणी दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासून करावयाचे निर्देश देण्यात आलेले आहेत.

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ व केंद्रिय वस्तू व सेवा कर अधिनियम २०१७ च्या कलम-५१ नुसार केंद्र शासनाच्या / राज्य शासनाच्या / स्थानिक स्वराज्य संस्थांच्या किंवा शासकिय अभिकरणांच्या आस्थापनांना वजातदार (Deductor) आणि वस्तू आणि सेवा अथवा दोन्ही पुरविणाऱ्या संस्थांना **वजाती (Deductee)** घोषित करण्यात आलेले आहे. कार्यालयाच्या स्तरावर आहरण व संवितरण अधिकारी यांनी **वजातदार (Deductor)** या नात्याने वस्तू किंवा सेवा अथवा दोन्ही अंर्तभूत असलेल्या देयकांमधून २% कर (TDS) वजावट करावयाची आहे. त्यास अनुसरुन आहरण व संवितरण अधिकारी, कोषागार / उपकोषागार अधिकारी तसेच अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना या परिपत्रकान्वये खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

**<u>आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावयाची कार्यवाही :-</u>**

१) करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हीबाबत २ % TDS देयकांमधून वजावट करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांनी GSTN प्रणालीवर स्वत:च्या कार्यालयाची नोंदणी करणे कायद्याने बंधनकारक आहे.

२) आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांच्याकडे दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ नंतर प्राप्त होणाऱ्या वस्तु किंवा सेवा इत्यादी संबंधिच्या पुरवठ्यासंदर्भात करावयाच्या प्रदानाच्या देयकांना महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियमांतर्गत TDS लागू होतो की नाही याची खातरजमा करावी.

३) दि. ०१ ऑक्टोबर, २०१८ पूर्वी करण्यात आलेल्या संविदाच्या बाबतीत देखील TDS च्या तरतूदी लागू होतील.

४) आहरण व संवितरण अधिकारी यांनी पुरवठादार / कंत्राटदार यांना देय असलेल्या रकमेबाबतची देयके तयार करताना देय असलेल्या एकूण रकमेमधुन २% TDS वजावट करण्याची दक्षता घ्यावी. २% TDS वजावट करण्यासाठी देण्यात आलेल्या लेखाशिर्षासमोर स्पष्टपणे रक्कम नमूद करणे आवश्यक राहील.

५) दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासुन वस्तू किंवा सेवा अथवा दोन्ही यांच्या पुरवठ्यासाठी करावयाच्या प्रदानावेळी जर सदरहू पुरवठ्याची संविदा करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हीच्या संदर्भात असेल व त्या संविदेचे मुल्य रु.२,५०,०००/- रकमेच्या वर असल्यास, अशी वजावट करणे बंधनकारक आहे. (MGST Act, २०१७)

६) २% TDS वजावट करावयाच्या कार्यवाहीसाठी तपशीलवार माहितीसाठी राज्य कर आयुक्त, वस्तू व सेवा कर यांचे परिपत्रक क्रमांक २७T, दिनांक ०७/०७/२०१७ .**(परिशिष्ट-अ-१)** व अंतर्गत परिपत्रक क्र. २६ अे- दि. १९/०९/२०१८ **(परिशिष्ट-अ-२)** चे अवलोकन करावे.

७) वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींसाठी २ % TDS वजावट करण्यासाठी किंवा आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या शंका समाधान करण्यासाठी प्रत्येक जिल्हानिहाय वस्तू व सेवा कर विभागाने TDS Officers घोषित केले असून संबंधीत अधिकाऱ्यांची यादी यासोबत देण्यात येत आहे.**(परिशिष्ट-ब).** **(परिशिष्ट ब मधील** अधिकारी जर बदलीनंतर स्थानांतरीत झाले तर त्याच्याऐवजी नवीन अधिकाऱ्याची माहिती www.gst.gov.in या संकेतस्थळावर पहाता येईल.)

८) कोषागार / उपकोषागार कार्यालय व अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांचेकडून पुरवठदार / कंत्राटदार यांना देय असलेली रक्कम नेहमीच्या कार्यपध्दतीप्रमाणे आहरण व संवितरण अधिकारी यांना

वितरीत करण्यात येईल व उर्वरित वजावट करण्यात आलेली (२ % TDS) रक्कम कोषागार / उपकोषागार कार्यालय व अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांचेकडून कोषागार धनादेश / Advice / EFT / NEFT व्दारे आहरण व संवितरण अधिकारी यांना देण्यात येईल.

९) आहरण व संवितरण अधिकारी यांनी अशा प्राप्त झालेल्या वजावटीच्या रकमा पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत भारतीय रिझर्व्ह बँक यांचेकडे जमा करणे कायद्याने बंधनकारक राहील.

१०) भारतीय रिझर्व्ह बँकेकडे अशा वजावटीच्या रकमा जमा करण्यासाठी प्राधिकृत करण्यात आलेल्या बँकांची यादी सोबत देण्यात येत आहे.**(परिशिष्ट-क)**

११) आहरण व संवितरण अधिकारी **वजातदार (Deductor)** या नात्याने, भारतीय रिझर्व्ह बँकेत ज्या महिन्यामध्ये अशी रक्कम वजावट करुन जमा करतील, त्या पुढील महिन्याच्या १० दिवसांचे आत त्यांनी Form GSTR-७ मध्ये Return File करणे बंधनकारक राहील. या संबंधीची तपशीलवार माहिती **परिशिष्ट-अ-१** मधील अनुक्रमांक ३ मध्ये नमूद करण्यात आलेली आहे.

१२) आहरण व संवितरण अधिकारी यांनी देयकासोबत प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे. **(परिशिष्ट-ड)**

**<u>कोषागार / उपकोषागार अधिकारी व अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी करावयाची कार्यवाही</u>**

१. कोषागार / उपकोषागार अधिकारी व अधिदान व लेखा अधिकारी यांनी दि. ०१ ऑक्टोबर, २०१८ पासून देयक प्रदान करताना या देयकांमधून २% TDS वजावट करण्यात आली आहे किंवा नाही याची तपासणी करावी व अशी वजावट केली नसल्यास देयके आक्षेपित करण्यात यावीत.

२. आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हीसाठी पुरवठादार / कंत्राटदार इ. यांना देय असलेल्या एकूण रकमेंमधून २ % TDS वजावट रक्कम उपलब्ध करुन दिलेल्या लेखाशिर्षासमोर नमूद केल्याची खात्री करण्यात यावी.

३. आहरण व संवितरण अधिकाऱ्याने पुरवठादार / कंत्राटदार इ. यांचे एकूण रकमेचे देयक सादर केल्यानंतर, पुरवठादार / कंत्राटदार यांना देय असलेली रक्कम नेहमीच्या कार्यपध्दतीप्रमाणे आहरण व संवितरण अधिकारी यांना वितरीत करण्यात यावी व उर्वरित वजावट करण्यात आलेली (२ % TDS) रक्कम कोषागार धनादेश / Advice / EFT / NEFT व्दारे आहरण व संवितरण अधिकारी यांना देण्यात यावी.

४. पुरवठादार / कंत्राटदार इ. यांचे एकूण रकमेच्या देयकांमधून २ % TDS वजावट खाली दिलेल्या लेखाशिर्षाखाली नमूद केल्याची खात्री करावी व लेखांकन करतांना कोषागार समायोजन (Treasury Adjustment) म्हणून दर्शविण्यात यावी.

| Major Head | ०००६ State Goods and Service Tax | **लेखाशीर्ष सांकेतांक** |
|---|---|---|
| Sub Major Head | ०० | |
| Minor Head | १०१ State Goods and Service Tax | |
| Group Head | (०१) Tax Collection | |
| Sub Group Head | (०१) (०२) Tax Deducted at Source | ०००६५२७९०१ |
| Minor Head | १०२ Interest | |
| Group Head | (०१) Interest Collection | |
| Sub Group Head | (०१) (०२) Interest on late payment of TDS | ०००६५२९७०१ |
| Minor Head | १०३ Penalty | |
| Group Head | (०१) Penalty Collection | |
| Subgroup Head | (०१)(०२) Penalty Collection for contravention on TDS provision | ०००६५३१२०१ |

५. वरीलप्रमाणे सर्व आहरण व संवितरण अधिकारी, कोषागार / उपकोषागार कार्यालय व अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासून कार्यवाही सुरु करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२८१७१४३६६६०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2018.09.28 17:34:37 +05'30'

( अनुदिप दिघे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२. सर्व सन्माननीय विधानसभा/विधान परिषद व संसद सदस्य.

३. राज्यपालांचे सचिव.

४. मुख्यमंत्र्यांचे सचिव.

५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.

७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख.

८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.

९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२.

१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन* नागपूर ४४४००१.

१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.

१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.

१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.

१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.

१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.

२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.

२२. सर्व विभागीय आयुक्त.

Office of the
Commissioner of State Tax, (GST)
8th floor, GST Bhavan,
Mazgaon, Mumbai-400010.

**TRADE CIRCULAR**

To,

.................................

.................................

No. JC/HQ-II/GST/TDS/Section -51/2017-18/ 455 Mumbai, Date 07/07/2017

**Trade Cir. No. 17 T of 2017**

**Subject** : Tax Deduction at Source as per section 51 of Goods and Services Act, 2017 and procedure to be followed by Departments or establishments of State Government, Local Authority, Governmental agencies.

**Ref.** : (1) Maharashtra Goods and Services Tax Act, 2017, and
(2) The Central Goods and Services Tax Act, 2017.

Sir/Gentlemen/Madam

The Maharashtra Goods and Services Tax Act, 2017, (hereinafter referred to as the "MGST Act") and the Central Goods and Services Tax Act, 2017, (hereinafter referred to as the "CGST Act") have come in to force with effect from 1st July 2017. The Goods and Services Tax Act envisages the tax on supply of goods and services or both. The provisions of *clause (vi)* of section 24 of the MGST/CGST Act, provides for compulsory registration in respect of persons who are required to deduct tax under section 51. Therefore, every Department or establishment of Central Government, State Government or local authority etc. will now be required to obtain registration under the MGST and CGST Act. The single application is to be used for registration. The registration facility under

aforesaid Act(s) is likely to be made available from 20th July 2017. For this purpose the respective Departments/Local authorities are requested to visit the Common Electronic Portal i.e. www.gst.gov.in.

2. The section 51 of the CGST and MGST Act provides that every department or establishment of the Central Government or the State Government or local authority, or Government Agencies to Deduct Tax at Source (hereinafter referred to as the "TDS"). These authorities are referred as the "Deductor" and the supplier of goods and services is referred to as "Deductee".

3. The deductor, in case of a contract where the total value of supply of taxable goods or services or both exceeds Rs. 2.5 Lakh (two lakh and fifty thousand) under a contract shall deduct 1% each for MGST and CGST, from the payment made or credited to the deductee i.e. where the supply is of taxable goods or services or both. The tax so deducted should be paid separately Therefore, every Deductor under MGST and CGST is required to deduct tax at the rate of one per cent each. Thus total deduction would be 2%.

4. It should be kept in mind that for the purpose of calculation of amount of two lakh and fifty thousand rupees, the central tax, state tax, integrated tax or the cess charged separately in the invoice should be excluded. In other words the MGST or the CGST or the tax paid under Integrated Goods and Services Tax Act, 2017 or for that matter the cess paid under the provisions of The Goods And Services Tax (Compensation to States) Act, 2017 needs to be excluded while calculation of limit of Rs. 2.5 Lakh.

5. 1% TDS each for MGST and CGST should be made when the supplier of the goods and services and the recipient of the services are located in the Maharashtra. However, if the recipient has its place of business (POB) registered in Maharashtra and supplier is situated in other state or Union

Territory, this will be an interstate supply and deductor will be required to deduct 2% TDS (under IGST) if the contract is otherwise found eligible for TDS.

6. As provided under section 24(vi) of MGST/CGST Act all DDOs of Maharashtra State will have to be compulsorily obtain registration under GST i.e. MGST and CGST. There will be a single registration number for both MGST/CGST Acts. The DDOs will be required to perform and discharge following functions,-

(a) Online/electronic payment of TDS so deducted;
(b) Filing of returns online.
(c) Online issuance of TDS Certificate to the supplier.

7. It is needless to add if the supplier for any reason has not shown tax separately in the invoice then in such eventuality the Deductor is required to make TDS on the entire value without considering the tax impact provided that the amount covered by said invoice is liable for deduction of TDS. It is clarified that, TDS is liable to be deducted on part payment or full and final payment as the case may be, if a particular contract of supply of goods or services is eligible for deduction of TDS.

**8. The procedure for registration of deductor, payment of tax deducted to Government, issuance of TDS Certificates etc. are explained as under.**

**(1) <u>Registration of TDS deductors:</u>**

(a) Section 24(vi) of CGST/MGST Act, 2017 provide compulsory registration for deductors without any threshold limit. Deductor will be required to get registered within 30 days from coming into operation section 51 of MGST Act and CGST Act. Either PAN or Tax Deduction and Collection Account Number (TAN) is mandatory for obtaining registration as deductor. This registration is compulsory for every Drawing and Disbursing Officer (DDO) in the state of Maharashtra.

(b) For obtaining registration as deductor, an application in Form **GST REG – 07** will have to be filled appropriately and uploaded on the Common Electronic Portal of Goods and Services Network (GSTN) www.gst.gov.in. The applicant should have a valid PAN or TAN as also a valid email ID and valid mobile number. After following due process the applicant will be required to submit the application to the Common Electronic Portal. The application so submitted will be assigned to the proper officer.

(c) The concerned officer will verify the correctness of the application and if found in order will approve the application and issue the registration number. Deductor can download registration certificate in Form **GST REG – 06** from portal.

(d) If liability to deduct TDS of any deductor ceases in future, an application can be uploaded on portal requesting cancellation of registration and said registration certificate will be cancelled.

**(2) Payment of TDS -**

(a) Every deductor is required to pay electronically to the Government the TDS deducted by him within 10 days from the end of the month in which deduction is made.

(b) The deductor would be liable to pay interest as provided under section 50(1) of MGST Act and CGST Act, if the tax deducted is not deposited within prescribed time.

**(3) Filing of return by deductors -**

(a) Deductor will be required to file a return in Form **GSTR-7** within 10 days from the end of month in which deduction is made. If in any month there is no deduction on account of TDS, deductor is not required to file return for that month.

(b) The details of tax deducted at source furnished by the deductor in Form GSTR-7 shall be made available to each supplier in Part C of Form **GSTR - 2A** electronically through the common portal and the said supplier

may include the same in Form **GSTR – 2** of the supplier (deductee). The supplier can take credit of this amount in his electronic cash register and use the same for payment of tax or any other liability.

(4) **Issuance of TDS Certificate** – A TDS deductor shall issue TDS certificate online in Form **GSTR-7A** to the deductee (the supplier from whose payment TDS is deducted) within 5 days of crediting the amount to the Government.

(5) **Penal Provisions:**

(a) If deductor fails to deduct TDS as provided under section 51(1) of MGST Act, or CGST Act, or deducted an amount which is less than the amount required to be deducted or fails to pay to the Government the amount deducted as tax, then deductor shall be liable to minimum penalty of Rs. 10000/- or an amount equal to the tax not deducted, short deducted or deducted and not paid to the Government.

(b) In case TDS certificate is not issued within prescribed time, deductor would be liable to pay late fee of Rs. 100/- per day from the expiry of the 5th day till the TDS certificate is issued. This late fee would not be more than Rs. 5000/-.

(6) **Refund of TDS** –

(a) Any excess or erroneous tax deducted and paid to the Government by deductor will be refunded as provided under section 51(8) of the CGST or the MGST Act, 2017.

(b) However, if the deducted amount is already credited to electronic cash ledger of the said supplier, then same shall not be refunded.

(7) **Transitional provision in respect of TDS** -

(a) As per the section 142(13) of the MGST Act where supplier has made sale of any goods before the appointed day i.e. on or 30th June 2017 and invoice has also been issued on or before the 30th June 2017 in such circumstances the TDS provisions under GST Act will not be applicable

despite the fact that the payment in respect of said sale is received on or after the 1st July 2017.

(b) In other words, in aforesaid eventualities, the TDS provisions under MGST, CGST or IGST, will not be applicable.

9. This circular is clarificatory in nature and cannot be made use of for interpretation of provisions of law. If any member of trade has any doubt, he may refer the matter to this office for further clarification.

**(Rajiv Jalota)**
Commissioner of State Tax (GST)
Maharashtra State

No. JC/HQ-II/GST/TDS/Section -51/2017-18/455 Mumbai, Date 07/07/2017

**Trade Circular No. 27T of 2017**

Copy forwarded for information to,

(1) The Joint Commissioner of State Tax, (MAHAVIKAS) with a request to upload this Trade circular on MSTD web-site.
(2) Officer on Special Duty, Finance Department, Mantralaya, Mumbai.
(3) Under Secretary, Finance Department, Mantralaya, Mumbai.
(4) Accounts Officer, Sales Tax Revenue Audit, Mumbai and Nagpur.

**(Dr. B N Patil)**
Joint Commissioner of State Tax (GST)
HQ-II, Maharashtra State.

राज्यकर सहआयुक्त (मुख्यालय-२),
महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालय,
केबिन नं. डी- १, ९ वा मजला,
जीएसटी भवन, माझगांव, मुंबई-०१०.

क्रमांकः रासआ/ मुख्या.२/ मवसेकका अंतर्गत टी डी एस / २०१८ -१९/ब-836 मुंबई, दिनांक 19 SEP 2018
अंतर्गत परिपत्रक क्र. 26अे- २०१८

**विषय**: केंद्र/ राज्य सरकार यांचे विभाग, स्थानिक प्राधिकरण, शासकीय अधिकरण यांनी महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ च्या कलम ५१ अनुसार मूळ स्त्रोतातून कराची कपात (टी डी एस) करण्यासंदर्भात अवलंबवयाची कार्यपद्धती.

संदर्भः १) महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा, २०१७
२) महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याअंतर्गत अधिसूचना क्रमांक- ५०/२०१८, राज्यकर दि. १८.०९.२०१८.

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ (मवसेकका), केंद्रीय वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ (केंवसेकका) आणि एकात्मिक वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ (एवसेकका) ची अंमलबजावणी दि. ०१/०७/२०१७ पासून सुरु झाली आहे. महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायद्याच्या कलम ५१ मध्ये टी डी एस संदर्भातील तरतुदींचा समावेश करण्यात आला आहे. केंद्र व राज्य शासनाचे विभाग, आस्थापना, स्थानिक प्राधिकरणे, शासकीय अभिकरणे आणि राज्य/ केंद्र शासनाकडून अधिसूचित करण्यात आलेल्या व्यक्तींना किंवा अशा व्यक्तींच्या प्रवर्गाला मूळ स्त्रोतातून कराची वजात (TDS)करावयाची आहे. महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ च्या कलम ५१ मधील पोट कलम (१), खंड (अ), (ब), (क) आणि (ड) नुसार संस्था किंवा व्यक्ती किंवा अशा व्यक्तींचा प्रवर्ग यांना " वजातदार" (Deductor) असे संबोधले जाईल आणि जो पुरवठादार माल व सेवा यांचा पुरवठा अशा वजातदारांना करत असेल, त्याला या कलमान्वये " वजाती"(Deductee) असे संबोधले जाईल.

या तरतुदीनुसार ज्या पुरवठ्याचे एका संविदेखालील मूल्य दोन लाख पन्नास हजार रुपयांपेक्षा अधिक असेल तेथे अशा करपात्र वस्तू किंवा सेवा यांच्या पुरवठ्यासाठी प्रदान करण्यात येणाऱ्या रकमेतून वजातदाराने (Deductor) महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ (MGST Act)

साठी एक टक्का व केंद्रीय वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ (CGST Act) साठी एक टक्का अशी एकूण दोन टक्के  इतक्या दराने कराची कपात (TDS) करणे बंधनकारक आहे. या कराच्या कपातीच्या प्रयोजनासाठी बीजकामध्ये दर्शविलेली केंद्रीय कराची, राज्य कराची, एकात्मिक कराची व उपकाराची रक्कम वगळून उर्वरित रक्कम ही पुरवठ्याचे मूल्य म्हणून गणली जाईल.

असे स्पष्ट करण्यात येते की जेथे दोन्ही, प्राप्तकर्ता आणि वस्तू व सेवा कर यांचा पुरवठादार (वजाती) यांचे स्थान महाराष्ट्रातील असेल तेथे स्थानिक पुरवठ्यावर वजातदाराने २ %  टी डी एस, (१ % राज्य कर आणि १ %  केंद्रीय कर) कपात करावयाची आहे. जर प्राप्तकर्त्याचे धंद्याचे ठिकाण महाराष्ट्रामध्ये नोंदीत असेल आणि पुरवठादार परराज्यातील किंवा संघराज्यातील असेल व जर संविदा मूळ स्त्रोतातून कपात करण्यास पात्र असेल तर हा आंतरराज्यीय पुरवठा होईल आणि वजातदाराने २% टी डी एस (एकात्मिक वस्तू व सेवा कराअंतर्गत-IGST) कपात करायची आहे. पुरवठादारांनी बीजकामध्ये स्वतंत्रपणे कर दाखविला नसेल तरी सुद्धा मूळ स्त्रोतातून कराची कपात करणे आवश्यक आहे. असे स्पष्ट करण्यात येते की जर वस्तू किंवा सेवा यांच्या पुरवठ्याची एखादी संविदा मूळ स्त्रोतातून  कपात करण्यास पात्र असेल तर अंशतः किंवा पूर्णतः प्रदान करण्यात येणाऱ्या रकमेवर टी डी एस ची कपात करण्यात यावी.

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याखालील अधिसूचना क्रमांक ३३/२०१७ ही दि. २१/०९/२०१७ रोजी जारी करण्यात आली असून त्याअन्वये महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याच्या कलम ५१ मधील "ड" मध्ये खालील संस्था किंवा व्यक्ती किंवा अशा व्यक्तींचा प्रवर्ग यांचा समावेश करण्यात आला आहे.

अ) प्राधिकरण किंवा मंडळ किंवा इतर संस्था, -

i) संसदेने किंवा राज्य विधानमंडळाने पारित केलेल्या कायद्यान्वये स्थापन झालेल्या; किंवा

ii) शासनाने स्थापन केलेल्या,

कोणत्याही कार्यासाठी ५१ टक्के किंवा त्याहून अधिक सहभाग इक्विटी किंवा नियंत्रणाद्वारे;

ब) केंद्र सरकार किंवा राज्य सरकार किंवा स्थानिक प्राधिकरण यांनी संस्था नोंदणी कायदा, १८६० (१८६० मधील  २१) नुसार स्थापन केलेल्या संस्था;

क) सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमः

वजातदाराची नोंदणी, कपात केलेल्या कराचा शासनाच्या खात्यात भरणा, टी डी एस प्रमाणपत्र देणे इ. विषयीची कार्यपद्धती खालील प्रमाणे स्पष्ट करण्यात आली आहे.

१) **टी डी एस वजातदाराची नोंदणी :-**

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायद्याच्या कलम २४ (६)नुसार वजातदाराला कोणत्याही उलाढालीच्या रकमेच्या मर्यादेशिवाय नोंदणी अनिवार्य केली आहे. महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ च्या कलम ५१ नुसार वजातदाराने तीस दिवसांमध्ये नोंदणी करणे आवश्यक आहे. वजातदार म्हणून नोंदणी करण्यासाठी पॅन किंवा कर वजात आणि संकलन खाते क्रमांक (टॅन) अनिवार्य आहे. ही नोंदणी महाराष्ट्रातील प्रत्येक आहरण आणि संवितरण अधिकाऱ्यांसाठी अनिवार्य आहे. वजातदार म्हणून नोंदणी करण्यासाठी अर्ज, नमुना जीएसटी आरईजी -०७ भरून www.gst.gov.in या पोर्टलवर ऑनलाइन सादर करावा. अर्जदाराकडे पॅन किंवा टॅन शिवाय वापरात असलेला ईमेल आयडी आणि मोबाईल क्रमांक असावा. वस्तु व सेवाकर अधिकारी यांनी सदरहू अर्ज मंजूर केल्यानंतर वजातदारास नोंदणी प्रमाणपत्र जीएसटी आरईजी -०६ नमुन्यात पोर्टलवर डाऊनलोड करता येईल. जर भविष्यात कोणत्याही वजातदाराचे टी. डी. एस. कपात करण्याचे दायित्व संपुष्टात येत असल्यास, तो नोंदणी रद्द करण्यासाठीचा विनंती अर्ज सदरहू पोर्टलवर सादर करू शकतो आणि त्यानुसार नोंदणी प्रमाणपत्र रद्द केले जाईल.

२) **टी.डी.एस. चा भरणा:-**

कोणत्याही वजातदाराने कर म्हणून कपात केलेली रक्कम, ज्या महिन्यात अशी कपात केली असेल, त्या महिन्याच्या समाप्तीनंतर १० दिवसांच्या आत शासनाच्या खात्यात भरणे आवश्यक आहे. जर वजातदाराने कपात केलेल्या कराची रक्कम विहित वेळेत जमा केली नाही तर वजातदार महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायदयाच्या कलम ५० (१) नुसार १८% दरसाल या दराने व्याज भरण्यास पात्र असेल.

३) **वजातदाराने भरावयाचे विवरण:-**

वजातदाराने ज्या महिन्यात कपात केली असेल, त्या महिन्याच्या कपातीनंतर १० दिवसांच्या आत जीएसटीआर-०७ या नमुन्यात विवरणपत्र दाखल करणे आवश्यक आहे. ज्या महिन्यात टी. डी. एस. ची कपात नसेल, त्या महिन्यासाठी वजातदाराला विवरणपत्र भरण्याची आवश्यकता नाही. वजातदाराने मूळ स्त्रोतातून कपात केलेल्या रकमेचा जीएसटीआर -०७ या नमुन्यात सादर केलेला तपशील प्रत्येक पुरवठादाराला जीएसटीआर -२ ए च्या भाग -क मध्ये सामान्य पोर्टलच्या माध्यमातुन इलेक्ट्रॉनिक पद्धतीने उपलब्ध करून दिला जाईल. सदर पुरवठादाराने इलेक्ट्रॉनिक पोर्टलवर संमती

(Acceptance)दर्शविल्यानंतर पुरवठादाराला या रकमेचे श्रेय त्याच्या इलेक्ट्रॉनिक रोकड खातेवहीमध्ये मिळेल आणि कर किंवा इतर कोणत्याही दायित्वाच्या भरपाईसाठी त्याचा वापर करता येईल.

**४) टी.डी.एस. प्रमाणपत्र जारी करणे:-**

वजातदाराने(कराची कपात करणारी व्यक्ती) कपात केलेली रक्कम शासनास प्रदान केल्यानंतर ५ दिवसांमध्ये वजातीला (असा पुरवठादार ज्याकडून टी.डी.एस. कपात केली आहे) जीएसटीआर-०७ए च्या नमुन्यात टी.डी.एस. प्रमाणपत्र द्यावयाचे आहे. हे प्रमाणपत्र पोर्टलच्या माध्यमातून ऑनलाईन जारी करता येईल.

**५) शास्ती विषयक तरतुदीः-**

(अ) महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायद्याच्या कलम ५१ (१)अ नुसार वजातदाराने टी डी एस कपात करण्यास कसूर केली असेल किंवा कमी रक्कम कपात केली असल्यास किंवा शासकीय खात्यात जमा करण्यास कसूर केली असेल, तर वजातदार रू. १०,०००/- किंवा कपात न केलेल्या रकमेएवढ्या किंवा कमी कपात केलेल्या रकमेएवढ्या किंवा कपात केलेल्या परंतू शासकीय खात्यात जमा न केलेली रक्कम यापैकी जी जास्त असेल तेवढ्या शास्तीस पात्र असेल.

(ब) वजातदाराने टी डी एस प्रमाणपत्र विहित कालावधीमध्ये जारी करण्यास कसूर केली असेल तर वजातदार अशा पाच दिवसांचा कालावधी समाप्तीनंतरच्या दिवसांपासून टी डी एस प्रमाणपत्र जारी करेपर्यंत, विलंब फी म्हणून, प्रतीदिन रु. १००/- देण्यास पात्र असेल. ही विलंब फी रु ५०००/- पेक्षा जास्त नसेल.

**६) टी डी एस चा परतावाः-**

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा आणि केंद्रीय वस्तू व सेवा कर कायद्याच्या कलम ५१ (८) नुसार वजातदाराने अतिरिक्त किंवा चुकीची कपात करून शासकीय खात्यात जमा केली असल्यास त्या रकमेचा परतावा देण्यात येईल. परंतु कपात केलेली रक्कम जर वजातीच्या इलेक्ट्रॉनिक रोकड खातेवहीमध्ये जमा झाली असल्यास, या रकमेचा परतावा देण्यात येणार नाही.

**७) टी डी एस संदर्भात संक्रमणविषयक तरतूदीः-**

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ च्या तरतूदीनुसार जर पुरवठादाराने मालाचा पुरवठा दि. ३०/०६/२०१७ पूर्वी केलेला असेल आणि विक्रीचे बीजक दिनांक ३०/०६/२०१७ पूर्वी जारी केले असेल आणि या बीजका विषयीची रक्कम जर दिनांक ०१/०७/२०१७ नंतर प्रदान केली असेल तर महाराष्ट्र

वस्तू व सेवा कर कायदा, केंद्रीय वस्तू व सेवा कर कायदा आणि एकात्मिक वस्तू व सेवा कर कायद्याखालील टी डी एस लागू होणार नाही. परंतु जर हे बीजक मूल्यवर्धित कर कायदा, २००२ च्या टी डी एस साठी पात्र असेल, तर मूल्यवर्धित कर कायदा, २००२ च्या कलम ३१ नुसार टी डी एस कपात करून भरावयाचा आहे.

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याच्या कलम ५१ ची अंमलबजावणी अधिसुचना क्र.- ५० नुसार दिनांक ०१/१०/२०१८ पासून लागू करण्यात आली आहे.

हे परिपत्रक स्पष्टीकरणात्मक असून याचा कायद्याच्या तरतुदींविषयी अर्थ लावण्यासाठी उपयोग करू नये. जर कोणत्याही व्यक्तीला याबाबत काही शंका असल्यास स्पष्टीकरणासाठी असे प्रकरण या कार्यालयात सादर करण्यात यावे.

राजीव जलोटा
राज्यकर आयुक्त
महाराष्ट्र राज्य.

क्रमांकः रासआ/ मुख्या.२/ मवसेकका अंतर्गत टी डी एस / २०१८ -१९/ब-८३६ मुंबई, दिनांकः
अंतर्गत परिपत्रक क्र.२६ अे-२०१८ १८/०९/२०१८

प्रत माहितीसाठी सादर,

१) राज्यकर सहआयुक्त (महाविकास) यांना हे अंतर्गत परिपत्रक राज्यकर विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यासाठी
२) विशेष कार्य अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अवर सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) लेखा अधिकारी, विक्रीकर महसूल लेखा परीक्षण, मुंबई व नागपूर .

18/9

(डॉ. भागवत पाटील)
राज्यकर सहआयुक्त (मुख्यालय-२),
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

| LIST OF TDS OFFICERS in MAHARASHTRA - ANNEXURE-B | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| Sr.No. | Nodal | DESK ID | OFFICER NAME | Mobile No. | Gmail ID |
| 1 | Mumbai-1 | MUM-VAT-E-804 | Arutwar Shriram Kishanrao | 8828146381 | sk.arutwar@gmail.com |
| 2 | Mumbai-2 | MUM-VAT-E-811 | Pawar Rajendra Nathuram | 9892909272 | pawar.rn11@gmail.com |
| 3 | Mumbai-3 | MUM-VAT-D-838 | Bhusal Ajit S. | 9029082138 | ajitbhusal19@gmail.com |
| 4 | Mumbai-4 | MUM-VAT-D-846 | Vikas Tanaji Darekar | 9819993482 | vikasdarekar1968@gmail.com |
| 5 | Mumbai-5 | MUM-VAT-D-903 | Pawar Dilip V. | 9766439609 | dilipvpawar78@gmail.com |
| 6 | Mumbai-6 | MUM-VAT-C-941 | Suresh D. Shinde | 8989096999 | shinde.sureshd@gmail.com |
| 7 | Mumbai-7 | MUM-VAT-C-937 | Kharade Prashant P. | 9923498383 | kharadeprashant75@gmail.com |
| 8 | Mumbai-8 | MUM-VAT-D-714 | Mhatre Rajendra Balaji | 9757081013 | mhatrerajendrabalaji@gmail.com |
| 9 | Mumbai-9 | MUM-VAT-D-205 | Dhondage Sayali | 9987895617 | dhondage.sayali@gmail.com |
| 10 | Mumbai-10 | MUM-VAT-D-501 | Metkar Yogesh | 9892018533 | metkar.yr@gmail.com |
| 11 | Mumbai-11 | MUM-BCP-C-014 | Bandekar Jayprakash D. | 9869255442 | jdbandekar65@gmail.com |
| 12 | Mumbai-12 | MUM-VAT-D-103 | Shinde Dadasaheb K | 9892701705 | acst103@gmail.com |
| 13 | Mumbai-13 | MUM-VAT-D-708 | Jagtap Vidyadhar S. | 9167762731 | samar.gov15@gmail.com |
| 14 | B.S.T. | S.T.O | Thorat Aparna Pradip | 9967444671 | thorat.ap@mahavat.gov.in |
| 15 | Thane | THA-VAT-D-005 | Raskar Ganesh Vilas | 9923076033 | gvraskar@gmail.com |
| 16 | Kalyan | KAL-VAT-D-006 | Patil Kunal Manohar | 9594794525 | patilkunal1329@gmail.com |
| 17 | Bhayander | BHY-PTO-C-001 | Girish Ramesh Sankhe | 9892944353 | sankheg@gmail.com |
| 18 | Raigad | RAI-VAT-C-007 | Shinde Rajendra B. | 9819552323 | shinde.rajendrac007@gmail.com |
| 19 | Alibaug | ALI-VAT-C-001 | Telang Sachidanand B. | 9029016290 | alivatc001@gmail.com |
| 20 | Pune-2 | PUN-VAT-C-508 | Shinde Sandeep Vasantrao | 9594095980 | sandeepshinde1020@gmail.com |
| 21 | Pune 3 | PUN-VAT-D-805 | Bhangdiya Abhijit Anil | 8698808540 | Acstd805@gmail.com |
| 22 | Solapur | SOL-SUR -C-001 | Kumbhar Shrinivas Sakharam | 9921853066 | shrinivaskumbhar1975@gmail.com |
| 23 | Osmanabad | OSM-SUR-C-001 | Choudhari Mahesh Jarichand | 7020735090 | maheshchoudhari5268@gmail.com |
| 24 | Barshi | BAR-VAT-C-001 | Dhawle Dhanaji Bhimrao | 9096799911 | dhawle18@gmail.com |
| 25 | Kolhapur | KOL-VAT-D-001 | Bangar Nitin Arjun | 8390253046 | nitinbangar2012@yahoo.com |
| 26 | Sangli | SAN-VAT-D--004 | Smt.Tarlekar Manisha Vivek | 8862032671 | mvtarlekar01@gmail.com |
| 27 | Satara | SAT-SUR-C-001 | JADHAV.K.M | 8983109010 | satsurc1@gmail.com |
| 28 | Ratnagiri | RAT-VAT-D-002 | Kamble Sagar Bandu | 9420904453 | sagarkamble940@gmail.com |
| 29 | Oras | ORA-VAT-C-001 | DINESH AMRIT SAWANT | 9867797440 | sawantoros@gmail.com |
| 30 | Nashik | NAS-VAT-C-013 | Kakad Pramod Motiram | 9004303966 | kakad.pm7868@gmail.com |
| 31 | Malegaon | MAL-VAT-C-001 | Vyavhare Ramakant P. | 9822768781 | ramakant.pv@gmail.com |
| 32 | Ahmednagar | AHM-VAT-C-006 | Undhare Tulshiram Ganpat | 9423912222 | undhare.tg@gmail.com |
| 33 | Dhule | DHU-BST-C-001 | Chatur Kailas Madhukar | 7020026029 | kmch2479@gmail.com |
| 34 | Nandurbar | NAD-PTO-C-001 | Dushing S.P. | 9011831645 | dspsan.sd@gmail.com |
| 35 | Jalgaon | JAG-VAT-C-005 | Pardeshi S.B. | 9923136122 | sbpardeshi.vat@gmail.com |
| 36 | Nagpur | NAG-VAT-C-034 | Tawar Rajendrasingh Jagnathsingh | 9421805438 | tawar.rajendrasingh@gmail.com |
| 37 | Bhandara | BHA-VAT-C-001 | Bawane Gopal Tranbak | 9028003350 | gopalbawane1986@gmail.com |
| 38 | Chandrapur | CHA-BCP-C-001 | Shankarwar Amit B. | 9028088801 | amitshankarwar80@gmail.com |
| 39 | Gadchiroli | GAD-VAT-C-002 | Madavi G.S. | 9158558228 | girish.madavi09@gmail.com |
| 40 | Gondia | GON-VAT-C-001 | Neware P.G. | 9764499274 | neware2011@gmail.com |
| 41 | Wardha | WAR-SUR-C-001 | Mundre Prashant Marotrao | 9850516340 | mundre.prashant@gmail.com |
| 42 | Amravati | AMR-BCP-C-004 | Khillare Samadhan A. | 7507105111 | khillare.sama@gmail.com |
| 43 | Washim | WAS-VAT-D-001 | Rathod Pratik | 7588189495 | pratik_jaihanuman@rediffmail.com |
| 44 | Akola | AKO-VAT-C-003 | Gawande Ravindra V. | 7028017442 | gawande.rv@gmail.com |
| 45 | Khamgaon | KHA-VAT-D-003 | Dhole Kishor P. | 9967437764 | dhole.kp@gmail.com |
| 46 | Yavatmal | YAV-VAT-D-003 | Smt. Kalpana D. Mirase | 9623243526 | kalpanamotale@gmail.com |
| 47 | Aurangabad | AUR-PTO-D-001 | Shinde Yogesh Vishnu | 9423151031 | syogesh177@gmail.com |
| 48 | Beed | BEE-PTO-C-001 | Shelke Anilkumar Prabhakarrao | 7588597802 | shelke76@gmail.com |
| 49 | Jalna | JAL-DDO-C-001 | Dandge Waman Sakahari | 9423741898 | dandge.ws@gmail.com |
| 50 | Nanded | NAN-VAT-C-003 | Chavan Avinash | 9673400045 | achavan70@gmail.com |
| 51 | Latur | LAT-SUR-C-001 | Jadhav Shivaji P. | 9421450545 | shivajijadhav112@gmail.com |
| 52 | Parbhani | PAR-SUR-C-001 | Swami Shivling S. | 9420965690 | swami.ss2015@gmail.com |
| 53 | Hingoli | HIN-SUR-C-001 | Wasmatkar Anirudha N. | 9766754439 | anirudhavasmatkar72629@gmail.com |
| 54 | Mumbai-HQ-2 | ACST-D-008 | Avhad Sunil J. | 9967913812 | sunilavhad05@gmail.com |

परिशिष्ट - क

## List of Banks

१) Allahabad Bank

२) Andhara Bank

३) Axis Bank

४) Bank of Baroda

५) Bank of India

६) Bank of Maharashtra

७) Canara Bank

८) Central Bank of India

९) Corporation Bank

१०) Dena Bank

११) HDFC Bank

१२) ICICI Bank Ltd.

१३) IDBI Bank

१४) Indian Bank

१५) Indian Overseas Bank

१६) Jammu and Kashmir Bank Ltd.

१७) Oriental Bank of Commerce

१८) Punjab and Sind Bank

१९) Punjab National Bank

२०) State Bank of India

२१) Syndicate Bank

२२) UCO Bank

२३) Union Bank of India

२४) United Bank of India

२५) Vijaya Bank

# (परिशिष्ट-ड)

(आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागारास देयकासोबत सादर करावयाचे प्रमाणपत्र)

मी ……………..नाव ………..………………पदनाम, आहरण व संवितरण अधिकारी असून असे प्रमाणित करतो/ करते की, देयक क्रमांक……… रक्कम रु. ……………/-(अक्षरी रु…………………) हे करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींच्या पुरवठ्यासंदर्भात असून त्यासाठीच्या संविदेचे मुल्य रु.२,५०,०००/- च्या वर आहे/ नाही. (लागू नसलेले खोडावे)

I. *सदर करपात्र वस्तू किंवा सेवा यांच्या पुरवठ्याबाबतच्या संविदेचे मुल्य रु. २,५०,०००/- च्या वर असून लेखाशिर्ष ……….मधून रक्कम रु. ………(अक्षरी रु…………………) २ % TDS वजावट करुन मला GSTN प्रणालीवर रक्कम जमा करण्यासाठी देण्यात यावी.

II. *सदर देयकाअंतर्गत पुरवठादार/ कंत्राटदार ई. यांनी पुरवठा केलेल्या वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींच्या बाबतीत महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याअंतर्गत करमाफ असल्याने कराची वजावट करण्याची आवश्यकता नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

उपरोक्त (I) किंवा (II) जे लागू नसेल ते खोडावे.

दिनांक:…………………………………… आहरण व संवितरण अधिकारी यांची स्वाक्षरी

नाव :………………………………………………..

GSTN नोंदणी क्रमांक…………. पदनाम :……………………………………………